**औरंगाबाद विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० या कालावधीत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्था-२०१८/प्र.क्र.१३०(भाग-५)/ई-१०**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ ऑक्टोबर, २०१९

वाचा:-१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०१९
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्था-२०१८/प्र.क्र.१३०(भाग-५)/ई-१०, दि.२०.०३.२०१९
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९
५) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०१९/मशाका १/तलाठी/आस्था-अरा-२//कावी, दि.१७.१०.२०१९

**प्रास्ताविक:-**

औरंगाबाद विभागातील तलाठी संवर्गाच्या २५३३ पदांचा आकृतीबंध शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६ अन्वये मंजूर करण्यात आला आहे. या पदांपैकी १०१० पदे ही अस्थायी असून त्यांना संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ या कालावधीत मुदतवाढ देण्यात आली होती. सदरची मुदत संपली असून आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० या कालावधीत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने औरंगाबाद विभागातील तलाठी संवर्गाच्या अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१. औरंगाबाद विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नव्हते, असे विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रमाणित केलेले आहे. सबब, औरंगाबाद विभागातील तलाठी संवर्गाच्या, पुढील परिशिष्टात दर्शविलेल्या एकूण-१०१० अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

## परिशिष्ट

| औरंगाबाद विभाग | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **जिल्हा** | **मंजूर पदे** | **स्थायी पदे** | **अस्थायी पदे** | **खर्चाचे लेखाशिर्ष** |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | औरंगाबाद | ३८९ | २५५ | १३४ | मागणी क्रमांक सी-१-२०५३-जिल्हा प्रशासन-०९४-इतर आस्थापना-०९४(०३) ग्राम अधिकारी-०९४-(०३)(०३) आयुक्त, औरंगाबाद वेतने (२०५३ ०३६ ९०१) |
| २ | जालना | २९७ | १८० | ११७ | |
| ३ | परभणी | २३९ | १४५ | ९४ | |
| ४ | हिंगोली | १७७ | ८३ | ९४ | |
| ५ | नांदेड | ४८३ | २८४ | १९९ | |
| ६ | बीड | ३८० | २४३ | १३७ | |
| ७ | लातूर | ३१७ | १८४ | १३३ | |
| ८ | उस्मानाबाद | २५१ | १४९ | १०२ | |
| **एकूण** | | **२५३३** | **१५२३** | **१०१०** | |

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च उपरोक्त परिशिष्टातील स्तंभ क्र. ६ नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.४ वरील शासन निर्णयातील तरतुदींप्रमाणे सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता मिळविण्याकरीता आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : पदनि-२०१६ / प्र.क्र.८ /१६/ आ.पु.क., दि. ११ सप्टेंबर, २०१९ अन्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०२२१५१०३१४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Raghuvir D Katke

Digitally signed by Raghuvir D Katke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f594954bd799968aa50aaa40154cd3ad3a036295890af4cd43ecc9f22dcb87a, serialNumber=c7afd3f6d4faa0e6c98e10d28dc71b935654c783f0397a6cdbefaeb5f6eef9da, cn=Raghuvir D Katke
Date: 2019.10.22 15:14:18 +05'30'

**( र. धों. कटके )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद

२) महालेखापाल-१ /२ (लेखा परीक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर

३) जिल्हाधिकारी, औरंगाबाद/जालना/परभणी/हिंगोली/नांदेड/बीड/लातूर/उस्मानाबाद

४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

५) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/जालना/परभणी/हिंगोली/नांदेड/बीड/लातूर/उस्मानाबाद

६) वित्त विभाग ( आ.पु.क. / व्यय-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

७) अवर सचिव (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९) निवड नस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.